आदिवासी मुलां-मुलींच्या शासकीय
वसतिगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात
येणा-या निर्वाहभत्त्यात वाढ करणेबाबत.

---

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्र. आवगृ-१२९८/प्र.क्र.८५/९८/का. १२
मंत्रालय, मुंबई- ३२
दिनांक : १५ जानेवारी, २००३.

वाचा : १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. बीसीएच-१३८४/३६३२७/का.१२,
दि. ११ जुलै, १९८५.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. बीसीएच-१०८९/(१३२)/का.१२,
दि. ५ डिसेंबर, १९८९.

प्रस्तावना :- आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या आदिवासी मुला-मुलींच्या शासकीय वसतिगृहातील विद्यार्थ्यांना निर्वाहभत्ता देण्याची योजना राबविण्यात येत आहे. सन २००१-०२ या वर्षा अखेर एकूण १९१ शासकीय वसतिगृहे या विभागाकडून चालविली जात होती. तदनंतर शासन निर्णय,क्र.आवगृ-१२००/प्र.क्र. ५०/ का.१२, दि. २८ जून, ०२ अन्वये नवीन ५३ शासकीय वसतिगृहांना मान्यता दिली आहे. त्यामुळे सन २००२-०३ या वर्षापर्यंत एकूण २४४ शासकीय वसतिगृहे या विभागाकडून चालविण्यात येत आहेत. या वसतिगृहांमध्ये राहणा-या विद्यार्थ्यांना शाळेमध्ये/ कॉलेजमध्ये जाण्या-येण्यासाठी वाहन खर्च, साबण,तेल, केशकर्तन इत्यादी स्वरूपाच्या खर्चासाठी निर्वाहभत्ता देण्यात येतो. सदर निर्वाह भत्ता विभागीय स्तरावरील वसतिगृहातील प्रति विद्यार्थ्यासाठी रु. १५०/- दरमहा व जिल्हा/ तालुका स्तरावरील वसतिगृहातील प्रति विद्यार्थ्यांसाठी रु. ५५/- दरमहा या दराने सध्या देण्यात येत आहे. हे दर ठरवून अनेक वर्षाचा कालावधी उलटून गेला आहे. या कालावधीत महागाईच्या निर्देशांकामध्ये फार मोठया प्रमाणावर वाढ झाली आहे. या बाबी विचारात घेवून सदर निर्वाह भत्त्यात वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- प्रस्तावनेतील सर्व बाबींचा विचार करुन आदिवासी मुला-मुलींच्या शासकीय वसतिगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या निर्वाह भत्त्यात या शासन निर्णयाव्दारे पुढील प्रमा वाढ करण्यास शासन मंजूरी देत आहे.

.....२./-

| अ.क्र. | वसतिगृह स्तर | प्रचलित दर (रु.) | सुधारित दर (रु.) |
|---|---|---|---|
| १ | विभागीय स्तरावरील वसतिगृह | १५० /- दरमहा प्रती विद्यार्थी | २०० /- दरमहा प्रती विद्यार्थी |
| २ | जिल्हा स्तरावरील वसतिगृह | २५ /-दरमहा प्रती विद्यार्थी | ७५ /- दरमहा प्रती विद्यार्थी |
| ३ | तालुका स्तरावरील वसतिगृह | २५ /-दरमहा प्रती विद्यार्थी | ५० /- दरमहा प्रती विद्यार्थी |

२. वरील प्रमाणे निर्वाह भत्त्याचे वाढीव दर हे चालू आर्थिक वर्षापासून (सन २००२-०३) लागू करण्यात करण्यात येतील. याकरिता आवश्यक असलेला निधी विहित अर्थसंकल्पीय मार्गाने मंजूर झाल्याशिवाय या बाबीवर कोणताही खर्च करण्यात येवू नये.

३. हा शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. १२८९/०२/व्यय-१४, दिनांक १०.१.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र. ग. देशमुख )
अवर सचिव

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री / उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्यसचिव, यांचे कार्यालय,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / नागपूर/ अमरावती.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
महालेखापाल , महाराष्ट्र,(लेखा ) महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग (का.क्र. व्यय-१४/ अर्थसं. १७) मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई - ३२
सचिव, सामाजिक न्याय,सां.कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव , आदिवासी विकास विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ३२
सर्व उप सचिव , आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासन
आदिवासी विकास विभाग निवड नस्ती/(का.१२)